**<u>वन महोत्सव २०१०-११</u>**
**वन महोत्सव कालावधीत करावयाच्या रोपांच्या वाटप व विक्री दराबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**ग्राम विकास व जलसंधारण विभाग**
**शासन निर्णय क्र.एसएलएफ-२०१०/प्र.क्र.५८/जल-१२,**
**मंत्रालय, मुंबई-४०० ०३२**
**दिनांक : २१ जून, २०१०**

**वाचा :-**

१) शासन निर्णय ग्राम विकास व जलसंधारण विभाग क्र.एसएलएफ-२००९/प्र.क्र.५०/जल-१२, दि. ६ जुलै, २००९
२) संचालक, सामाजिक वनीकरण संचालनालय,पुणे यांचे पत्र कक्ष-९(२)/वनम/०३/दर/७२९/१०-११, दि. २८ मे, २०१०

**<u>प्रस्तावना :-</u>**

दि.५ जून ते १५ ऑगस्ट हा काळ वन महोत्सवाचा काळ म्हणून दरवर्षी साजरा केला जातो. या कालावधीत वनीकरणासाठी लोकांना उद्युक्त करण्याच्या दृष्टीने शासनामार्फत सवलतीच्या दराने रोपांचा पुरवठा करण्यांत येत असतो. हा लोकांचा कार्यक्रम व्हावा व त्याचबरोबर जनतेला वनीकरणाचे महत्व पटवून द्यावे या दृष्टीने वन महोत्सवाच्या कालावधीत सुधारित केलेल्या सवलतीच्या दराप्रमाणे रोपांचा पुरवठा करण्याची योजना सन २००९-२०१० या वर्षात संदर्भ क्र.१ अन्वये पुढे चालू ठेवण्यांत आली होती. सन २०१०-११ या आर्थिक वर्षात सदर योजना चालू ठेवण्याची बाब शासनाच्या विचाराधिन होती.

**<u>शासन निर्णय :</u>**

आता सन २००९-१० या वर्षाचा अनुभव तसेच जनतेचा प्रतिसाद लक्षात घेऊन ही योजना सन २०१०-२०११ या आर्थिक वर्षात सुध्दा चालू ठेवण्यास व प्रभावीपणे राबविण्यास याअन्वये शासन मान्यता देण्यात येत आहे. सदर वनमहोत्सवाचा कालावधी दि. ५ जून ते १५ ऑगस्ट, २०१० असा राहील .

२. वन महोत्सवाच्या कालावधीत सवलतीच्या दराने करावयाचा रोपांचा पुरवठा सन २०१०-११ या आर्थिक वर्षात खालील सवलतीच्या दराने करण्यात यावा. <u>सदर दर हे वन महोत्सवाच्या कालावधीसाठी निर्धारित केले आहेत.</u>

२/-

| अ.क्र | प्रजातीचे वर्गीकरण | प्रजातींचे नांव | सन २०१०-२०११ साठी मान्य करण्यांत आलेले रोपविक्रीचे दर (रुपयांमध्ये) | |
|---|---|---|---|---|
| | | | पॉलिथिन पिशवीतील रोपे | उघडी रोपे |
| १ | २ | ३ | ४ | ५ |
| १ | इंधन, हलके इमारती लाकूड, चारा, सरपणासाठी उपयुक्त वृक्ष प्रजाती | अ)सुबाभूळ, ग्लिरिसिडीया, भेंडी, बाभूळ,खैर,निलगिरी,प्रोसोपिस,महारुख,पांगारा | २.५० | २.०० |
| | | ब)अंजन, नीम, सुरु, काशिद, शिरस, बकैन, लिंब, ऑस्ट्रेलियन /अकेशिया बाभूळ, करंज, सावर | २.५० | २.०० |
| २ | साधारण फळवृक्ष | विलायती चिंच, चिंच, बोर, आवळा,सिताफळ, शेवगा, जांभूळ, हादगा, रायवळ, आंबा, मोहा, कवठ, बेहडा, हिरडा, वड, उंबर, पिंपळ,बिबा,बेल, खिरणी, रामफळ | २.५० | २.०० |
| ३ | मौल्यवान फळ वृक्ष | काजू, रातांबा, चारोळी | ६.०० | ३.०० |
| ४ | व्यापारी/इमारती लाकूड /मौल्यवान प्रजाती | अ) शिवण, बीजा | ३.०० | २.०० |
| | | ब) बांबू | ३.०० | २.०० |
| | | क) पिशव्यातील साग रोपे | ३.०० | १.७५ |
| ५ | बांधावर लावण्यासाठी प्रजाती | घायपात कंद, खस, गवत, थोंब, (२० से.मी.उंचीचे) | -- | ५.०० (प्रति किलो) |
| ६ | शोभिवंत वृक्ष | सिल्व्हर ओक, स्पॉयोडिया गुलमोहर, अमलताशा,ॲक्टोकार्पस,इंडियन फॉर्म (बूच), बॉटल ब्रश, चाफा, रेन ट्री, पेल्ट्रो फोरम, कांचन, रातराणी, पारिजात, बोगनवेल, ट्रॅकिश, क्रोट्रान | ५.०० | ३.०० |
| ७ | फांदयापासून वृक्ष लागवड करण्यासाठी डांब (१५० ते २०० से.मी.उंची, १० ते १२ से.मी.गोलाई) | वड, भेंडी, ग्लिरिसिडीया, पांगारा, शेवगा, चाफा, सांबर, महारुख, पॉपलर | ७.५० (प्रतिनग) | -- |
| ८ | औषधी वनस्पती प्रजाती | अर्जून, गुरुमुख, कटकी, ब्राम्ही, अनंतमूळ, कुट, शतावरी, रिठा, सर्पगंध, इसबगोल, गुळवेल, मुरुडशेंग, अडसुळा, वावडिंग, कडीपत्ता, गुंज, डीकेमाली, कोरफड, रगतरोडा व इतर प्रजाती | ७.५० | -- |
| ९ | इतर मौल्यवान प्रजाती | अ) ड्रुपिंग, अशोका, चंदन | १५.०० | -- |
| | | ब)ख्रिसमस ट्री, पिवळा बांबू, थुजा | ३०.०० | -- |

३/-

(यामध्ये समाविष्ट नसलेल्या प्रजाती 'ना नफा, ना तोटा' या तत्वावर विकण्यात येतील तसेच इच्छुकांनी सागाची रोपे वन विकास महामंडळामार्फत निश्चित केलेल्या दराने विकत घ्यावीत.)

३. किसान रोपवाटिका आर्थिक स्थैर्यांच्या भक्कम पायावर उभ्या राहाव्यात व त्याचवेळी रोपांच्या दरात देण्यांत येणारी सवलत पूर्णपणे जनतेसाठी उपलब्ध व्हावी या दृष्टीने आदेश देण्यात येत आहेत, की सवलतीच्या दराने रोपांचा पुरवठा करण्यांस किसान रोपवाटिका धारक बांधील राहणार नाही. सवलतीच्या दराने पुरवावयाची रोपे प्रत्येक व्यक्ती, संस्था किंवा इतर यांना १०० रोपांपेक्षा जास्त असू नये. १०० रोपांपेक्षा जास्त रोपांसाठी सवलतीच्या दरावर २५% जास्तीचे शुल्क आकारावे.

४. वन महोत्सवाच्या कालावधीत (५ जून ते १५ ऑगस्ट) वन महोत्सवाचे प्रयोजन व महत्व याबाबत प्रभावीपणे सर्वदूर पोहचणाऱ्या माध्यमातून योग्य प्रसिध्दी देण्यात यावी. तसेच मेळावे व तत्सम कार्यक्रम राबविण्यांत यावेत, यासाठी लागणारा खर्च प्रसिध्दीसाठी उपलब्ध असलेल्या निधीतून करण्यांत यावा.

५. शाळा / संस्थांना रोप पुरवठा करण्याबाबत शासन निर्णय ग्राम विकास व जलसंधारण विभाग क्र.एसएलएफ-१४९३/प्र.क्र.२२/जल-१४, दि.६ ऑक्टोबर, १९९७ मधील तरतूदी लागू राहतील.

६. संचालक, सामाजिक वनीकरण, महाराष्ट्र राज्य, पुणे यांना कळविण्यांत येते की, रोपांच्या निर्मितीसाठी आलेला/येणारा खर्च व त्यांच्या विक्रीतून एकूण जमा झालेला महसूल याबाबतचा चालू आर्थिक वर्षाचा (दि.१ एप्रिल, २०१० ते ३० सप्टेंबर, २०१०) तपशील सोबतच्या विहित नमुन्यात सादर करावा. अन्य कालावधीत रोपांची विक्री 'ना नफा, ना तोटा' या तत्वावर करण्यांत यावी.

७. याबाबतचा खर्च मागणी क्र.एल-३, मुख्य लेखाशीर्ष - २४०६ वनीकरण व वन्यजीवन - १०१ वन संरक्षण व विकास -१०१ (०१) (०१) वन महोत्सव (२४०६ १६६४) या लेखाशिर्षाखाली खर्ची टाकण्यांत यावा व सन २०१०- २०११ वर्षाकरीता मंजूर केलेल्या निधीतून भागविण्यांत यावा.

८. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या वेबसाईटवर उपलब्ध करण्यात आला असून, त्याचा संगणक सांकेतांक **२०१००६२११८५७४६००१** असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावांने,

**( रेखा भिडे )**
**सह सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**
संचालक, सामाजिक वनीकरण, महाराष्ट्र राज्य, पुणे
प्रधान मुख्य वनसंरक्षक, महाराष्ट्र राज्य, नागपूर,
सर्व सहसंचालक, सामाजिक वनीकरण वृत्ते,
सर्व वनसंरक्षक
सर्व उपसंचालक, सामाजिक वनीकरण विभाग,
व्यवस्थापकीय संचालक, वन विकास महामंडळ, महाराष्ट्र राज्य, नागपूर,
विभागीय वन अधिकारी, प्रादेशिक (सर्व),
सर्व विभागीय आयुक्त,

सर्व मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषदा,
सर्व जिल्हाधिकारी,
महालेखापाल (लेखापरिक्षा), महाराष्ट्र राज्य, मुंबई/नागपूर
महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र राज्य, मुंबई/नागपूर
निवासी लेखा अधिकारी, मुंबई
अधिदान व लेखाअधिकारी, मुंबई
सर्व जिल्हा कोषागार अधिकारी,
कार्यासन अधिकारी, वित्त विभाग, व्यय-१५, मंत्रालय, मुंबई-३२
कार्यासन अधिकारी/जल-११, जल-१३, ग्राम विकास व जलसंधारण विभाग,
नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
निवडनस्ती/जल-१२

**ग्राम विकास व जलसंधारण विभाग**
**क्र. एसएलएफ - २०१०/प्र.क्र.५८/जल-१२, दि. २१ जून, २०१०.**
**सोबतचे विवरणपत्र**

| अ.क्र. | तयार करण्यात आलेल्या रोपांची संख्या (लाखात) | रोपे तयार करण्यासाठी आलेला खर्च (हजारांत) | एकूण विक्री झालेल्या रोपांची संख्या | विक्रीतून वसूल झालेली रक्कम (रुपये हजारात) | शिल्लक राहिलेल्या रोपांची संख्या |
|---|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ | ६ |
| | | | | | |

D:\sandip\JAL-12 2010\GR 58.lwp